**कृष्णा-कोयना उपसा सिंचन योजनेअंतर्गत म्हैसाळ उपसा सिंचन योजनेसाठी सौर ऊर्जा प्रकल्प उभारणे व योजनेची ऊर्जा कार्यक्षमता सुधारण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. म्हैसाळ सौउप्र/प्रमा/२०२४/(७६/२०२४)/जवि**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०४ मार्च , २०२५

**वाचा :**
१) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र. सुप्रमा- १२२२/प्रक्र. ४६१/ २०२२ मोप्र-१, दि. २९.१२.२०२२
२) महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग शासन निर्णय दि .१५.०३.२०२४
३) अधीक्षक अभियंता तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ पुणे, यांचे पत्र क्र. कोसंचिमं/जविवि-२/म्हैसाळ/८०५/२०२४ दि. ०९.०७.२०२४.
४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे जा. क्र. कासं/ मकृखोविम-०२ /(२७४/२०२३)/प्रबां-४/४४६९/२०२४ दि. १६.०७.२०२४

**प्रस्तावना :-**

कृष्णा कोयना उपसा सिंचन प्रकल्पांतर्गत ताकारी व म्हैसाळ अशा दोन स्वतंत्र उपसा सिंचन योजनांचा समावेश असून सदर प्रकल्पाच्या रू. ८२७२.३६ कोटी इतक्या किंमतीस शासनाने दि.२९.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये पाचवी सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

म्हैसाळ उपसा सिंचन योजनेचा उद्भव कृष्णा नदीवर म्हैसाळ गावाजवळ असून या योजनेद्वारे विविध टप्प्यांमध्ये २३.४४ अघफू पाणी उचलून त्याद्वारे सांगली जिल्ह्यातील मिरज, कवठे महांकाळ, तासगांव, जत व सोलापूर जिल्ह्यातील सांगोला व मंगळवेढा या तालुक्यातील अवर्षण प्रवण भागातील १,०८,१९७ हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. शासन निर्णय दि. २९.१२.२०२२ मधील अट क्र.१ नुसार प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करताना शासनाने “प्रकल्पांतर्गत पाणी उपसा करण्यासाठी लागणा-या उर्जा स्त्रोतांमध्ये सौर उर्जा वापराचा जास्तीत जास्त प्रयत्न करावा. सौर उर्जा प्रकल्पांसाठी महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाकडे विषयांकित प्रकल्पाच्या कार्यक्षेत्रात अतिरीक्त जमिनी उपलब्ध असल्यास त्याचा विचार करावा” अशी अट घातली होती.

त्या अनुषंगाने म्हैसाळ उपसा सिंचन योजनेसाठी लागणा-या विजेच्या वापरापोटी होणा-या खर्चात बचत करण्याच्या दृष्टीने उर्जा कार्यक्षम जलव्यवस्थापन व सौर ऊर्जा प्रकल्प राबविणेसाठी भांडवल निधीसहाय्य मिळविण्याकरिता प्राथमिक प्रकल्प अहवालास (PPR) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाच्या आर्थिक व्यवहार विभागाने मान्यता दिली आहे.

मा. मंत्रीमंडळाने म्हैसाळ उपसा सिंचन योजनेच्या वीज देयकांचा खर्च कमी करणे व ग्रीन एनर्जी निर्मितीसाठी कायमस्वरुपी उपाय योजना म्हणून उर्जा कार्यक्षम जलव्यवस्थापन व सौर ऊर्जा प्रकल्प राबविण्याकरिता केएफडब्ल्यु जर्मन बँकेकडून १३० मिलियन युरो (अंदाजे रु. ११२० कोटी) कर्ज स्वरूपात व रु. ४७४ कोटी राज्य शासनातर्फे गुंतविण्यासाठीच्या अशा एकूण रु. १५९४ कोटी किंमतीच्या प्रकल्पाचा करार करण्यास मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने राज्य शासन, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ व KfW बँक यांचेदरम्यान त्रिपक्षीय करार करण्यात आला आहे.

म्हैसाळ उपसा सिंचन योजनेच्या वीज देयकांचा खर्च कमी करणे व ग्रीन एनर्जी निर्मितीसाठी कायमस्वरुपी उपाय योजना म्हणून उर्जा कार्यक्षम जलव्यवस्थापन अंतर्गत म्हैसाळ सिंचन योजनेच्या एकुण १०८ पंपांपैकी ६५ पंप हे नवीन उर्जा कार्यक्षम पंपांनी बदलणे व तसेच APFC व SCADA यंत्रणा बसवणे व २०० मे.वॅ. क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प उभारणी करणे, तयार झालेली वीज स्वतंत्र विद्युत वाहिनी द्वारे २२०/३३ के.व्ही नरवाड उपकेंद्रापर्यंत पुरवणे प्रस्तावित आहे.

शासनाने (उर्जा विभाग) दि.१५.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयानुसार राज्यातील सर्व उच्चदाब आणि अति उच्चदाब उपसा सिंचन योजनांचे सौर उर्जीकरण करण्याच्या योजनेस मान्यता दिली आहे. परंतु म्हैसाळ योजनेसाठी जलसंपदा विभागामार्फत सौर उर्जीकरण प्रकल्प राबविण्यात येत असल्यामुळे तिला उपरोक्त नमुद योजनेतुन वगळण्यात आले आहे. राज्य तांत्रिक सल्लागार समितीने दि.०९.०७.२०२४ रोजीच्या पत्रानुसार प्रकल्पाची छाननी केली असून महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने दि.१६.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार सदर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावित म्हैसाळ उपसा सिंचन योजना सौर ऊर्जेवर चालविणे व योजनेची ऊर्जा कार्यक्षमता सुधारणे या प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून एकूण रु. १५९४.०९ कोटी (रुपये एक हजार पाचशे चौ-याण्णव कोटी व नउ लक्ष फक्त) इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. प्रकल्पाच्या तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्ट-अ मध्ये जोडला आहे.

१. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी अहवालातील मुद्दा क्र. २७ मध्ये नमुद केलेल्या सर्व सुचना/ अटी यांची पुर्तता महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने करावी.
२. सर्व वैधानिक मान्यता प्राप्त केल्याखेरीज प्रकल्पाची कामे हाती घेऊ नये.
३. सर्व तांत्रिक मान्यता सक्षम स्तरावर घेण्यात याव्यात.
४. सदर प्रकल्पाच्या प्रत्येक घडामोडीत महावितरण कंपनीस प्रथम पासून समाविष्ट करावे.
५. प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे.
६. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. यासंदर्भात प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC

ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोर पणे अंमलबजावणी करण्यात यावी.

७. सदर प्रकल्पांसंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपद्धतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक अनियमितता निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना सहमती आहे असे गृहीत धरता येणार नाही.

८. प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

९. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करु नये.

१०. सदर प्रकल्पाच्या महाराष्ट्र वीज नियामक आयोग (MERC), महावितरण, तसेच प्रकल्पाकरिता लागणा-या वीज खरेदी करार (PPA), Renewable Purchase Obligation (RPO) याकरिता मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई हे समन्वय अधिकारी राहतील.

११. महाराष्ट्र शासन ,उद्योग, ऊर्जा , कामगार व खनिकर्म विभाग शासन निर्णय दि. १५.०३.२०२४ नुसारच्या सौर ऊर्जा निर्मिती व बँकींग संदर्भातील तरतूदी म्हैसाळ सौर ऊर्जा योजनेकरिता लागू राहतील.

प्रकल्पाच्या तरतुदीचा उपशिर्षनिहाय गोषवारा परिशिष्ट - अ मध्ये सोबत जोडला आहे.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र.आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७००-मोठे पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०२) विविध पाटबंधारे विकास महामंडळाना भागभांडवली अंशदान,(०२)(०२) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (उर्वरित महाराष्ट्र)(कार्यक्रम) ,५४-गुंतवणुका (संगणक सांकेतांक ४७०००९६) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय उर्जा, नियोजन व वित्त विभागाच्या प्राप्त झालेल्या सहमतीने तसेच राज्य मंत्रिमंडळाच्या दि. १८.०२.२०२५ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०३०४१७४११८४६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

PRASAD
RAMCHANDRA
NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=a6ed48fac9cffe22f8b946d38d8e2e2fa82aaab527c88c93f7b0dbdb50f0b562, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=33920684CC4219BA0C032228E6FCB8E71C1AD22733A9255E354DE8029E9E8160, cn=PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
Date: 2025.03.04 17:42:32 +05'30'

सहपत्र — परिशिष्ट- अ

**(प्रसाद नार्वेकर)**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव.
४. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. अपर मुख्य सचिव, ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
८. महालेखापाल (लेखापरीक्षा/अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर.
९. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. मा.मंत्री (जलसंपदा) (गोदावरी व कृष्णा खोरे विकास महामंडळ), यांचे खाजगी सचिव.
११. मा.मंत्री (जलसंपदा) (विदर्भ,तापी व कोकण खोरे विकास महामंडळ), यांचे खाजगी सचिव.
१२. सचिव (प्रस), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१४. आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. सर्व संबंधित मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१६. जवि कार्यासन संग्रहार्थ.

**परिशिष्ट- अ**

**जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. म्हैसाळ सौउप्र/प्रमा/ २०२४/(७६/२०२४)/जवि,**
**दि. ०४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र**
**प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदीचा गोषवारा**

| अ. क्र. | बाब | कामाची किंमत | वस्तू आणि सेवा कर | एकूण किंमत (रु लक्ष) |
|---|---|---|---|---|
| **अ** | **ऊर्जा कार्यक्षम जलव्यवस्थापन व SCADA प्रणालीचा वापर करुन म्हैसाळ उपसा सिंचन योजनेसाठी लागणा-या वीजेची बचत** | | | |
| १ | मूळ स्थिती पुनर्स्थापना (Basic Conditioning Restoration) | ४१९५.५९ | ७५५.२१ | ४९५०.८० |
| २ | सद्यस्थिती पंप बदलून ऊर्जा कार्यक्षम पंप बसविणे | १२८८०.४० | २३१८.४७ | १५१९८.८७ |
| ३ | APFC पॅनेल बसविणे | ४३२.७७ | ७७.९ | ५१०.६७ |
| ४ | SCADA प्रणालीचा वापर | २६३७.५५ | ४७४.७६ | ३११२.३१ |
| | **प्रकल्प घटक अ: ऊर्जा कार्यक्षम जलव्यवस्थापन व SCADA प्रणालीसाठी लागणारी एकूण गुंतवणूक** | **२०१४६.३१** | **३६२६.३४** | **२३७७२.६५** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **ब** | **म्हैसाळ उपसा सिंचन योजनेसाठी शाश्वत विद्युत पुरवठा करणेसाठी सौर उर्जा प्रकल्प उभारणे** | | | |
| **I** | **मुख्य विद्युत घटक** | | | |
| १ | Solar Modules | ४९१९९.४० | ५९०३.९३ | ५५१०३.३३ |
| २ | SMB | २९२.८० | ३५.१४ | ३२७.९४ |
| ३ | Inverter | १८७०.०० | २२४.४ | २०९४.४० |
| ४ | Transformer | १४२८.०० | १७१.३६ | १५९९.३६ |
| ५ | ICOG Panels | १३४.३० | १६.१२ | १५०.४२ |
| **II** | **वाहिनी (Cables)** | ७०७४.०६ | १२७३.३३ | ८३४७.३९ |
| **III** | **Solar Module माउंटिंग आणि आधार संरचना** | | | |
| १ | Concrete for Foundation | ४६७२.९८ | ८४१.१४ | ५५१४.१२ |
| २ | Reinforcement (Fe ५००) for Foundation | ५०१७.४८ | ९०३.१५ | ५९२०.६३ |
| ३ | MMS Support (Steel Structures) | १०९२२.६३ | १९६६.०७ | १२८८८.७० |
| ४ | Cable Tray & Walkway (Steel Structures) | २५४१.०० | ४५७.३८ | २९९८.३८ |
| **IV** | **३३ kV वाहिनी - HT पॅनेल पासून उपकेंद्रापर्यंत** | ८१.०० | १४.५८ | ९५.५८ |
| **V** | **Balance System (Other Components)** | १५३८.३८ | २७६.९१ | १८१५.२९ |
| | **एकूण सौर ऊर्जा निर्मिती प्रकल्प किंमत** | **८४७७२.०२** | **१२०८३.५१** | **९६८५५.५३** |
| **VI** | **पुरवठा, उभारणी, चाचणी व कार्यान्वितीकरण** | | | |
| १ | Rate as % of total | ५.०० % | | |
| २ | Cost | ४२३८.६० | ७६२.९५ | ५००१.५५ |
| | **सौर ऊर्जा प्रकल्पाची एकूण किंमत** | **८९०१०.६२** | **१२८४६.४६** | **१०१८५७.०८** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **VII** | **ऊर्जा निष्कासन व्यवस्था** | | | |
| १ | ३३/२२० kV उपकेंद्र | ३५६०.०० | ६४०.८ | ४२००.८० |
| २ | २२० kV पारेषण वाहिनी | १२०४१.२४ | २१६७.४२ | १४२०८.६६ |
| | **ऊर्जा निष्कासन व्यवस्थेची एकूण किंमत** | **१५६०१.२४** | **२८०८.२२** | **१८४०९.४६** |
| | **प्रकल्प घटक ब: सौर उर्जा प्रकल्पासाठीची ऊर्जा निष्कासन व्यवस्थेसहीत एकूण किंमत** | **१०४६११.८६** | **१५६५४.६८** | **१२०२६६.५४** |
| | **एकूण (अ + ब)** | **१२४७५८.१७** | **१९२८१.०२** | **१४४०३९.१९** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **क** | **सल्लागार सेवा [ एकूण (अ + ब) रकमेच्या १.२%]** | १४९७.१० | | १४९७.१० |
| **ड** | **विमा व इतर अनुषंगीक खर्च [एकूण (अ + ब) रकमेच्या ६.८%]** | ८४८३.५६ | | ८४८३.५६ |
| **इ** | **एकूण किंमत ( अ+ब+क+ड)** | **१३४७३८.८२** | **१९२८१.०२** | **१५४०१९.८४** |
| **फ** | **आकस्मिक निधी [एकूण किमतीच्या (इ) ४%]** | ५३८९.५५ | | ५३८९.५५ |
| **ग** | **एकूण मूळ किंमत + आकस्मिक निधी (इ+फ)** | **१४०१२८.३७** | **१९२८१.०२** | **१५९४०९.३९** |

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=a6ed48fac9cffe22f8b946d38d8e2e2fa82aaab527c88c93f7b0dbdb50f0b562, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=33920684CC4219BA0C032228E6FCB8E71C1AD22733A9255E354DE8029E9E8160, cn=PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
Date: 2025.03.04 17:42:55 +05'30'

**(प्रसाद नार्वेकर)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**